सचिव, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, मुंबई या पदावर तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

मराठी भाषा विभाग

**शासन आदेश क्र. विश्वप -२०२१/प्र.क्र.४५/आस्था-२**

नवीन प्रशासन भवन, ८वा मजला,

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक: २९ ऑगस्ट, २०२३

**शासन आदेश:-**

महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, वाई कार्यालय येथे सहायक सचिव, गट-ब (राजपत्रित) या संवर्गातील (वेतनश्रेणी एस-१५ : ४१८००-१३२३००/-) पदावर कार्यरत असलेल्या डॉ. शामकांत बा. देवरे यांना सन २०२२-२३ या वर्षाच्या निवडसूचीत सातव्या वेतन आयोगानुसार एस-२३ : ६७७००-२०८७०० या वेतनसंरचनेतील सचिव, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, मुंबई या एकाकी व रिक्त पदावर या आदेशाद्वारे विहित केलेल्या अटी व शर्तींच्या अधीन राहून निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यात येत आहे.

तसेच, डॉ. शामकांत बा. देवरे यांची पदोन्नतीनंतरची पदस्थापना खालील विवरणपत्रातील "स्तंभ-३" मध्ये त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या ठिकाणी करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव व सध्याची पदस्थापना | पदोन्नतीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|
| (१) | (२) | (३) |
| १. | डॉ. शामकांत बा. देवरे, सहायक सचिव, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, वाई कार्यालय. | सचिव, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, मुंबई |

सदर पदोन्नती खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे. :-

१) मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र. २८३०६/२०१७ च्या अधीन राहून पदोन्नतीच्या कोट्यातील सर्व रिक्त पदे दि. २५.०५.२००४ स्थित सेवाज्येष्ठतेनुसार, निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात भरण्याबाबत सा.प्र.वि./१६-ब कार्यासनाच्या दि.०७.०५.२०२१ च्या शासन निर्णयानुसार दिलेल्या सूचनांनुसार सदर मान्यता देण्यात येत आहे. तसेच, दि. ०७ मे, २०२१ च्या शासन निर्णयाप्रकरणी मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे

आव्हान देण्यात आलेले असून त्यावरील अंतिम न्यायनिर्णयाच्या अधीन राहून सदर पदोन्नती देण्यात येत आहे.

२) सदर पदाच्या नियुक्तीशी संबंधित रिट याचिका क्र. ७२०१/२०१९ अद्याप प्रलंबित असल्याने सदर रिट याचिकेतील अंतिम निर्णयाच्या अधीन राहून तसेच, यासंदर्भात दाखल पुनर्विलोकन याचिका स्टॅम्प क्र. २९२३८/२०२३ मधील अंतिम निर्णयाच्या अधीन राहून सचिव, गट- अ, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ या पदावर पदोन्नती देण्यात येत आहे.

३) महाराष्ट्र राज्य प्रशिक्षण धोरणातील तरतुदींनुसार शासनाने वेळोवेळी विहित केलेले प्रशिक्षण पूर्ण करणे संबंधित पदोन्नत अधिकाऱ्यास बंधनकारक आहे.

४) पदोन्नतीने पदस्थापना दिलेल्या अधिकाऱ्यास कळविण्यात येते की, त्यांनी पदस्थापनेचे आदेश प्राप्त झाल्यापासून १ महिन्याच्या आत पदस्थापनेच्या ठिकाणी हजर होणे आवश्यक आहे. त्याप्रमाणे ते विहित मुदतीत पदस्थापनेच्या ठिकाणी हजर झाले नाहीत, तर त्यांना पदोन्नतीमध्ये स्वारस्य नाही, असे गृहीत धरुन शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग दिनांक ३०.०४.१९९१ मधील तरतुदींनुसार त्यांची पदोन्नती रद्द करण्यात येईल.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०८२९१२५०४६१३३३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VAISHALI LAHU WAGHMARE

Digitally signed by VAISHALI LAHU WAGHMARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MARATHI LANGUAGE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1a04bc63dad109dbcf1f43d6ad6a6b5f92b8f2c67d44331739500eba2bdfc622, pseudonym=E1BFA1A05AFD2F8E8BE45C3B7FCA1A87900F4192, serialNumber=F557034494093273E810D83B4B4760417E6293A17606F1295B2E68D6F099E122, cn=VAISHALI LAHU WAGHMARE
Date: 2023.08.29 16:52:13 +05'30'

(वैशाली वाघमारे)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.

२. महालेखापाल (लेखापरिक्षा), मुंबई/नागपूर.

३. मा. मंत्री, मराठी भाषा विभाग यांचे खाजगी सचिव.

४. सचिव, मराठी भाषा विभाग यांचे स्वीय सहायक.

५. उपसचिव, सामान्य प्रशासन विभाग (का-१२/का-१६ब) यांचे स्वीय सहायक.

६. उप सचिव, मराठी भाषा विभाग यांचे स्वीय सहायक.

७. सर्व अवर सचिव/कक्ष अधिकारी, मराठी भाषा विभाग, मंत्रालय.

८. भाषा संचालक, भाषा संचालनालय, मुंबई.

९. सचिव, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, मुंबई.

१०. सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई.

११. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

१२. डॉ. शामकांत बा. देवरे, सहायक सचिव, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, वाई कार्यालय (महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, मुंबई कार्यालयामार्फत)

१३. निवड नस्ती.